**नवीन फ्रॅंकिंग मशीन खरेदी करण्यास परवानगी मिळणेबाबत.**

**महाराष्ट शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय** क्र.सैकवि-२०१०/१४६२/प्र.क्र.४२६/१०/२८
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - १५ फेब्रुवारी,२०११.

**वाचा** : संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१००९५/सैकवि-७/५८५०, दिनांक ०७.१०.२०१०

**शासन निर्णय**

सैनिक कल्याण विभाग, पुणे या कार्यालयासाठी केंद्रीय भांडार, पुणे यांच्या दरपत्रकानुसार Pitney Bowes DM 100i हे फ्रॅंकिंग मशीन अंदाजित मूळ किंमत रु. १,१६,०५०/- (रुपये एक लक्ष सोळा हजार पन्नास फक्त) अधिक मूल्य वर्धित कर रु. १४,५०६/- मिळून एकूण रु. १,३०,५५६/- (रुपये एक लाख तीस हजार पाचशे छप्पन्न फक्त) इतक्या किंमतीस खरेदी करण्यास शासन मंजुरी देत आहे. ही यंत्र खरेदी खरेदीची विहित प्रक्रीया अवलंबून करण्यात यावी.

२. यंत्र खरेदीचा रु. १,३०,५५६/- (रुपये एक लाख तीस हजार पाचशे छप्पन्न फक्त) इतका खर्च मागणी क्रमांक ए-५, लेखाशीर्ष "२२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण- (००)(०३)- सैनिक कल्याण विभाग (२२३५ ००५१)-१३-कार्यालयीन खर्च " याखालील सन २०१०-११ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. संस्थेने Pitney Bowes DM 100i हे फ्रॅंकिंग मशीन सुस्थितीत राहाण्यासाठी आवश्यक तो सेवा संविदा करार विहित पध्दतीने करावा.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तीका, १९७८च्या भाग पहिला, उप विभाग ४ मधील अ.क्र.१२ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सचिव व विशेष चौकशी अधिकारी-१, महाराष्ट्र शासन, सामान्य प्रशासन विभाग यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०२१५२०४६३९००१ असा आहे.

महाराष्टाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही/-**
(अ. द. जोशी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे. (५ प्रती)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, मुंबई / नागपूर.

महालेखापाल (लेखा परीक्षा) - १, मुंबई / नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्या २५.
वित्त विभाग, व्यय - ४/विनियम /अर्थसंकल्प-१४
निवड नस्ती.